**समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षासाठी राज्य हिस्सा (General)लेखाशीर्ष २२०२ आय ६१२ अंतर्गत ०१ वेतन उद्दिष्टाखाली तरतूद वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:पूरक-२०२२/प्र.क्र.१०० /प्रशिक्षण**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०२३

**प्रस्तावना:-**

समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण (Teacher Education) ही केंद्र पुरस्कृत योजना आहे (६०:४०) सदर योजनेंतर्गत राज्यातील जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थामधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व अनुषंगीक इतर थकीत देयके अदा करण्यासाठी राज्य हिस्सा (General)लेखाशीर्ष २२०२ आय ६१२ अंतर्गत ०१ वेतन उद्दिष्टाखाली रु. २५.०० कोटी इतक्या रकमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे. सदर मंजूर केलेल्या तरतूदीमधून पन्नास टक्के रक्कम रु.१२,५०,००,०००/-(रुपये बारा कोटी पन्नास लाख फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यात आली आहे सदर रक्कमेतून डिसेंबर,२०२२ व जानेवारी,२०२३ चे अंशत: वेतन झाले आहे. उर्वरीत जानेवारी, २०२३ व फेब्रुवारी,२०२३ चे वेतन व अनुषंगीक इतर थकीत देयके अदा करण्यासाठी रु.१२,५०,००,०००/- (रुपये बारा कोटी पन्नास लाख फक्त ) इतकी तरतूद आवश्यक असल्याबाबत संचालकांनी दि.१०.०२.२०२३ च्या पत्रान्वये शासनास कळविले आहे. त्यानुसार उर्वरीत रक्कम वितरीत करण्याच्या प्रस्तावास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार व वित्त विभागाने दिनांक ६ मे २०२२ च्या पत्रान्वये दिलेल्या मार्गदर्शनानुसार खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासननिर्णयः-**

समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण (Teacher Education)या केंद्र पुरस्कृत योजना असून या योजनेसाठी केंद्र शासन ६०% व राज्य शासन ४०% निधी उपलब्ध करून देते. यामधून राज्यातील जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थामधील अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन व अनुषंगीक इतर थकीत देयके अदा करण्यात येतात. सदर योजनेसाठी जानेवारी, २०२३ व फेब्रुवारी,२०२३ चे वेतन व अनुषंगीक इतर थकीत देयके अदा करण्यासाठी राज्यहिस्सा (General Head) सर्वसाधारण लेखाशीर्ष २२०२ आय ६१२

अंतर्गत ०१ वेतन उद्दिष्टाखाली रु. २५.०० कोटी इतक्या रकमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे. सदर मंजूर केलेल्या तरतूदीमधून शिल्लक पन्नास टक्के रक्कम रु.१२,५०,००,०००/-(रुपये बारा कोटी पन्नास लाख फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च मागणी क्र. ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण १०६, शिक्षक आणि इतर सेवा , (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (२२०२ I ६१२)सर्वसाधारण, (राज्य हिस्सा ४० टक्के) या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर ०१ वेतन या उद्दिष्टाखालील तरतुद, नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, शिक्षण यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ४.०४.२०२२ च्या शासन परिपत्रकातील तसेच आनुषंगिक परिपत्रकांच्या सूचनांनुसार करण्यात यावा.

४. वित्त विभागाने दिनांक ६ मे २०२२ च्या पत्रान्वये केलेल्या मार्गदर्शनानुसार सदर अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनावरील खर्च सुरुवातीला राज्य हिश्श्याच्या लेखाशिर्षांतर्गत ०१ वेतन उद्दीष्टांतर्गत तरतूद मधून करण्यात येत आहे. तसेच सदर अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या वेतनाखाली होणाऱ्या कपातीच्या नोंदी जसे GPF,GIS, Income Tax इ.राज्यातील HRMS/IFMIS (सेवार्थ प्रणाली)मध्ये ठेवण्यात याव्यात.

५. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर वितरीत निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर खर्चाचा अहवाल, उपयोगिता प्रमाणपत्र इत्यादींची माहिती प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा व शालेय शिक्षण व क्रीडा विभागास आयुक्त(शिक्षण) व संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, यांनी पाठवावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र २१३/व्यय-५ दि. २१/०२/२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२२७१६०३४४३७२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEHA NANDKUMAR HUMRASKAR

Digitally signed by NEHA NANDKUMAR HUMRASKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=fad9131f2c2ae9d6d9bb053715c4b9e08b15382beb01922a7bf2c233de3f7a45, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D597D0579F83EBCFE4417B54A6F0F51D17796B044C4649DF1D9A2A0E92B2B851, cn=NEHA NANDKUMAR HUMRASKAR
Date: 2023.02.28 11:32:09 +05'30'

**(नेहा हुमरसकर)**

**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे
६. राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा अभियान, चर्नीरोड, मुंबई.
७. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
८. संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य,पुणे
१०.संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
१२.महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१३.सर्व प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (DIET)
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.वित्तविभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.
१७.अर्थसंकल्प कार्यासन, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी मंजूर रक्कम बी.डी.एस.प्रणालीवर तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.
१८. निवडनस्ती (प्रशिक्षण).